महानगरपालिका क्षेत्रात विधानसभा मतदार संघनिहाय विद्युत वितरण नियंत्रण समिती गठीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**शासन निर्णय क्रमांक : मपास -२०१७/प्र.क्र. १९७ /ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०९ जून, २०१७.

वाचा : उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्रमांक : जिस्तस-२०१५/ प्र.क्र.५२ /ऊर्जा-५ दिनांक २६ मार्च, २०१५

**प्रस्तावना :**

वीज पुरवठा ही अत्यंत महत्वाची सेवा आहे. ग्राहक व वीज वितरण कंपनी यामध्ये सुसंवाद व समन्वय नसल्यास अडचणीच्या प्रसंगी ग्राहकांमध्ये असंतोष निर्माण होऊ नये व महावितरण कंपनीचा कारभार पारदर्शक व प्रभावीपणे चालविण्यासाठी व ग्राहकांना उत्तम व दर्जेदार सेवा पुरविण्यासाठी जिल्हास्तरावर व तालुकास्तरावर विद्युत वितरण नियंत्रण समित्या उपरोक्त शासन निर्णयान्वये गठीत करण्यास शासनाची मंजुरी देण्यात आली आहे. परंतु महानगरपालिका क्षेत्रात अशा प्रकारच्या समित्या गठित करण्याबाबत संदर्भिय शासन निर्णयात उल्लेख नसल्याने सदर क्षेत्रातील ग्राहक व वीज वितरण कंपनी यामध्ये सुसंवाद व समन्वय राहण्याच्या दृष्टीने महानगरपालिका क्षेत्रात विद्युत वितरण नियंत्रण समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

महानगरपालिका क्षेत्रात विद्युत वितरण नियंत्रण समित्या गठित करण्यास याद्वारे शासनाची मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर विद्युत वितरण समित्यांमध्ये ज्या सदस्यांचा अंतर्भाव करावयाचा आहे त्याबाबत माहिती सोबतच्या **परिशिष्ट “अ”** मध्ये देण्यात आली आहे.

३. सदर समितीच्या कार्यकक्षेबाबतची माहिती **परिशिष्ट “ब”** मध्ये देण्यात आली आहे. या कार्यकक्षेत समितीने आपले कार्य पार पाडून विद्युत वितरण विषयक शासनाच्या धोरणाची / निर्णयाची अंमलबजावणी करण्यास मदत करणे अपेक्षित आहे.

४. समितीच्या बैठका दर तीन महिन्यांनी घेण्यात याव्यात व बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयांची/ शासनास करावयाच्या शिफारशी संदर्भात माहिती संबंधित मुख्य अभियंत्यामार्फत शासनास अवगत करावी.

५. सदर महानगरपालिका क्षेत्रात विद्युत वितरण नियंत्रण समितीचे गठन संबंधित महानगर पालिका आयुक्त यांनी करावे. समितीचे गठन करण्याबाबत आदेश निर्गमित करण्यापूर्वी अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीस मा. पालकमंत्री यांची सहमती संबंधित महानगरपालिका आयुक्त यांनी संबंधित अधिक्षक अभियंता, महावितरण यांच्या सहकार्याने घ्यावी. ही कार्यवाही या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्यात पूर्ण करावी.

६. अशासकीय व शासकीय सदस्यांना प्रचलित नियमांनुसार प्रवास खर्च व देय भत्ते अनुज्ञेय नाही.

७. महानगरपालिका क्षेत्रात समितीच्या अशासकीय सदस्यांना मनपा आयुक्त यांनी समितीचे ओळखपत्र द्यावे. अशासकीय सदस्यांच्या समितीवर केलेल्या नियुक्त्या शासनाच्या पुढील आदेशापर्यंत असल्याचे स्पष्टपणे संबंधित आदेशात नमूद करण्यात यावे तसेच सदर पदावर नियुक्त करण्याचे अधिकार अथवा पदमुक्त करण्याचे अधिकार शासन राखून ठेवीत असल्याचा उल्लेखही सदर आदेशात करण्यात यावा.

८. सर्व संबंधित अधिक्षक अभियंता, महावितरण / कार्यकारी अभियंता, महावितरण यांनी संबंधित मनपा आयुक्त यांना समितीच्या गठन प्रकियेत सहकार्य करावे.

९. व्यवस्थापकीय संचालक, महावितरण यांनी संबंधित महानगरपालिका क्षेत्रातील समित्यां गठीत करण्यासाठी अधिक्षक अभियंता, महावितरण यांचे स्तरावरुन उचित सूचना द्याव्यात व तसेच संबंधित मनपा आयुक्त यांचे मार्फत समिती गठीत करण्याची कार्यवाही विहित कालमर्यादेत पार पाडण्यासाठी आवश्यक कार्यवाही करावी.

१०. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०६०९१६१०३३३३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.06.09 16:08:19 +05'30'

( भि. य.मंता )
**शासनाचे उपसचिव**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्यसचिव
३) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
४) मा. राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
५) मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/विधान सभा,विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
६) मा.विधान परिषद / विधान सभा सदस्य, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अध्यक्ष, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, सेंटर नं.१,१३ वा मजला, मुंबई ०५.
९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज मंडळ सुत्रधारी कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व),मुंबई-५१
१०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी, प्रकाशगंगा, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
१३) सर्व महानगरपालिका आयुक्त
१४) सर्व मंत्रालयीन विभाग
१५) कक्ष अधिकारी (प्रशासन-२), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.

# परिशिष्ट “अ”

महानगरपालिका क्षेत्रातील विद्युत वितरण नियंत्रण समितीची संरचना खालीलप्रमाणे आहे :-

| | | |
|---|---|---|
| अध्यक्ष | : | विधानसभा सदस्य किंवा ते नेमणूक करतील ती व्यक्ती |
| सहअध्यक्ष | : | क्षेत्रातील इतर विधानसभा सदस्य |
| सहअध्यक्ष | : | क्षेत्रातील कार्यकारी अभियंता,महावितरण |
| सदस्य | : | १. त्या विधान सभा मतदार संघ क्षेत्रातील सर्व झोन सभापती (असल्यास).<br>२. त्या विधान सभा मतदार संघ क्षेत्रातील १० नगर सेवक<br>३. आयुक्त नेमणूक करतील ते म.न.पा.अधिकारी (उपायुक्ता पेक्षा कमी दर्जा नसलेले)<br>४. त्या विधान सभा मतदार संघ क्षेत्रातील सर्व प्रभाग अधिकारी<br>५. विधानसभा मतदार संघ क्षेत्रातील तहसिलदार किंवा नायब तहसिलदार |
| सदस्य सचिव | : | उपविभागीय अभियंता, महावितरण (तालुक्यातील जास्त कार्यक्षेत्र असणारा) |
| प्रतिनिधी<br>(१ ते ७ सदस्य) | | १. उद्योग क्षेत्र ग्राहक<br>२. शिक्षण क्षेत्र ग्राहक<br>३. व्यावसायिक ग्राहक<br>४. घरगुती ग्राहक<br>५. वीज वितरण क्षेत्रात उत्कृष्ट कार्य करणारी व्यक्ती<br>६. वीज वितरण क्षेत्रात उत्कृष्ट कार्य करणारी व्यक्ती<br>७. ग्राहक हितासाठी कार्य करणाऱ्या दोन अशासकीय संस्थांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी |

******

# परिशिष्ट “ब”

**महानगरपालिका क्षेत्रातील विद्युत वितरण नियंत्रण समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे आहे :-**

१. महावितरणतर्फे सूरु असलेल्या पायाभूत आराखडा, गावठाणासाठी स्वतंत्र फिडर्स, दिनदयाळ उपाध्याय ग्रामज्योती योजना, एकात्मिक विद्युत विकास योजना, इतर कार्यान्वित असलेल्या योजना, देखभाल दुरुस्ती इत्यादी कामांचा आढावा घेणे, केंद्र व राज्य शासनाच्या वीज वितरणाबाबत सर्व योजनांचा आढावा घेणे.

२. महावितरणतर्फे विद्युत बिलांच्या वसुलीसाठी केल्या जाणाऱ्या प्रयत्नांचा आढावा घेणे.

३. महानगरपालिका क्षेत्रातील विजेचा गैरवापर रोखणे व त्यासाठी केल्या जाणाऱ्या प्रयत्नांचा आढावा घेणे.

४. महानगरपालिका क्षेत्रातील घरगुती ग्राहकांच्या प्रलंबित जोडण्यांचा आढावा घेणे.

५. राज्य शासनातर्फे राबविल्या जाणाऱ्या सौर ऊर्जा प्रकल्पाच्या कामावर देखरेख ठेवणे व आढावा घेणे.

६. महानगरपालिका क्षेत्रात सुरळीत व खात्रीशीर विद्युत पुरवठा व्हावा, ग्राहकांना व्यवस्थित सेवा मिळावी यासाठी मार्गदर्शन करणे.

७. समितीचे कामकाज योग्य पध्दतीने चालविण्यासाठी कालावधी निश्चित करणे. त्रैमासिक एक निश्चित तारीख ठरवावी व त्या दिवशी ती बैठक झालीच पाहिजे, असे बंधन असावे. सदस्य सचिवाने बैठकीचे आयोजन अध्यक्षांची वेळ घेऊन करावे.

८. समिती बैठकीत झालेली चर्चा व निर्णय योग्य माध्यमाद्वारे प्रसिध्द केले जावे .

९. समितीचे माध्यमातून मांडल्या गेलेल्या सूचनांची त्वरीत अंमलबजावणी करावी व केलेली अंमलबजावणी संबंधितांना कळवावी.

१०. समितीने नवीन प्रकल्प/ योजना सुचविल्यास त्याचा विचार करुन सक्षम प्राधिकरणाकडे प्रस्ताव पाठवून मंजूर करणे. निधी मिळविणे.

११. समितीने वितरण कंपनी व ग्राहक यांच्यात समन्वय व संवाद साधावा.

१२. समितीसमोर ग्राहकांना त्यांची कैफियत / तक्रार मांडायची असेल तर तशी आगाऊ लेखी सूचना / तक्रार मागवून त्याला ती मांडण्याची व्यवस्था असावी .

१३. सदस्य महोदयांचा त्या- त्या स्तरावर योग्य तो सन्मान राखला जाईल याची दक्षता घ्यावी.

१४. सदस्यांना वीज वितरण कंपनीकडून ओळखपत्र द्यावे.

१५. महसूल वसूलीचे १००% उद्दिष्ट पूर्ण करणे, विजेची हानी कमी करणे, ग्राहक सेवा देणे व वीज वितरण क्षेत्रामध्ये उत्कृष्ट कार्य करणाऱ्या महानगरपालिका क्षेत्रातील एक कार्यकारी अभियंता / दोन अतिरिक्त कार्यकारी अभियंता / दोन उपकार्यकारी अभियंता / दोन सहाय्यक अभियंता / दोन वरिष्ठ तंत्रज्ञ/ दोन कनिष्ठ तंत्रज्ञ इतक्या अधिकारी /कर्मचाऱ्यांची वार्षिक निवड करुन त्यांचा सत्कार करण्यात यावा.

१६. नव्याने होत असलेल्या प्रकल्पाच्या गुणवत्तेवर लक्ष देणे.

१७. विजेच्या पायाभूत सुविधा/देखभाल इत्यादी करीता जिल्हा नियोजन समिती/सामाजिक न्याय/ अदिवासी विकास विभाग / शासनाचे इतर विभाग यांचेकडून निधी मिळविणे.

१८. वार्षिक जनता दरबार आयोजित करुन जनतेच्या समस्या सोडविणे.

१९. नैसर्गिक आपत्तीने उध्दवस्त झालेल्या पायाभूत सुविधा पुनर्स्थापन करण्याकरिता राज्याच्या मदत व पुनर्वसन खात्याकडून निधीची मागणी करणे.

२०. एनर्जी कॉन्झर्वेशन पॉलिसीनुसार महानगरपालिका क्षेत्रामध्ये विजेची बचत करण्याकरीता उपाययोजना राबविणे.

२१. अपारंपारिक ऊर्जा स्त्रोत तयार करुन अपारंपारिक ऊर्जा निर्माण करण्याचे प्रयत्न करणे.

******